राज्यातील अभिमत विद्यापीठातील व्यावसायिक अभ्यासक्रमाच्या विद्यार्थ्यां करीता शासनाची प्रचलित शिष्यवृत्ती प्रतिपूर्ती योजना लागू करण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**इतर मागास बहुजन कल्याण विभाग**
**शासन निर्णय क्र. शिवृत्ती-२०२३/प्र.क्र.८४/शिक्षण-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- १४ जून, २०२४.

**संदर्भ :-**१) शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्रमांक ईबीसी-२००९/प्र.क्र.१४६/मावक-२, दि.२७.०७.२००९.
२) शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, क्र.टीईएम-२०१०/(१२५/२०१०)/तांशि-४, दि.०६.११.२०१०.
३) मा.उच्च न्यायालय, मुंबई यांचे क्र.६९/२०२१ या जनहित याचिकेत दि.२०.०३.२०१५ रोजीचे आदेश.
४) शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग क्र.संकीर्ण-२०१७/प्र.क्र.३३२/तांशि-४, दि.०७.१०.२०१७.
५) University Grants Commission Notification No.F.१-२/२०१८ (CPP-I/DU) UGC (Institutions Deemed to be Universities) Regulations, २०१९, dated २०.०२.२०१९.
६) शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग सीटीसी-२०२०/प्र.क्र.२३/तांशि-४ दि.१४.१०.२०२१ व दि.०७.१२.२०२१.
७) न्या.श्री.एम.एन.गिलानी (निवृत्त) तथा माजी अध्यक्ष शुल्क नियामक प्राधिकरण, मुंबई यांच्या समितीचा दि.२७.१२.२०२१ रोजीचा अहवाल.
८) शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, सिटीसी २०२०/प्र.क्र.२३/तांशि-४, दिनांक २३.२.२०२३

**प्रस्तावना :-**

राज्यातील अभिमत विद्यापीठातील विविध प्रशासकीय विभागांच्या नियंत्रणाखालील व्यावसायिक अभ्यासक्रमांचे शिक्षण घेणाऱ्या व राज्य शासनाच्या प्रचलित धोरणानुसार परीक्षा शुल्क व शिक्षण शुल्क प्रतिपुर्तीकरीता पात्र ठरणाऱ्या विद्यार्थ्यांना सन २०२२-२३ या शैक्षणिक वर्षापासून राजर्षी छत्रपती शाहू महाराज शिक्षण शुल्क शिष्यवृत्ती योजनेचे लाभ अनुज्ञेय करण्याच्या अनुषंगाने शासनाच्या उच्च व तंत्र शिक्षण विभागाकडून न्या.श्री.एम. एन.गिलानी (निवृत्त) तथा माजी अध्यक्ष, शुल्क नियामक प्राधिकरण, मुंबई यांच्या अध्यक्षतेखाली समिती नियुक्त करण्यात आली होती. सदर समितीच्या अहवालातील शिफारशी मा.राज्य मंत्री मंडळाच्या मान्यतेने स्वीकारुन उच्च व तंत्र शिक्षण विभागाच्या शासन निर्णय संदर्भ क्र.९ अन्वये राज्यातील अभिमत विद्यापीठात व्यावसायिक अभ्यासक्रमांचे शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यांना राज्य शासनाच्या प्रचलित धोरणानुसार परीक्षा शुल्क व शिक्षण शुल्क प्रतिपूर्तीकरिता पात्र ठरविण्यात आले आहे.

उक्तप्रमाणे उच्च व तंत्र शिक्षण विभागामार्फत अभिमत विद्यापीठातील व्यावसायिक अभ्यासक्रमासाठी प्रवेशित विद्यार्थ्यांसाठी लागू करण्यात आलेल्या परीक्षा शुल्क व शिक्षण शुल्क प्रतिपुर्ती योजनांच्या धर्तीवर अभिमत विद्यापीठात व्यावसायिक अभ्यासक्रमांचे शिक्षण घेणाऱ्या इमाव, विजाभज व विमाप्रच्या विद्यार्थ्यांना सन २०२३-२४ या शैक्षणिक वर्षापासून परीक्षा शुल्क व शिक्षण शुल्क प्रतिपूर्ती योजनेचा लाभ अनुज्ञेय करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u> :-**

१. राज्यातील अभिमत विद्यापीठात व्यावसायिक अभ्यासक्रमांचे शिक्षण घेणाऱ्या व राज्य शासनाच्या प्रचलित धोरणानुसार परीक्षा शुल्क व शिक्षण शुल्क प्रतिपूर्तीकरिता पात्र ठरणाऱ्या अन्य विद्यार्थ्यांप्रमाणे अभिमत विद्यापीठात व्यावसायिक अभ्यासक्रमासाठी प्रवेशित विमुक्त जाती भटक्या जमाती, इतर मागास वर्ग व विशेष मागास प्रवर्गातील विद्यार्थ्यांना शासन निर्णय उच्च व तंत्र शिक्षण विभाग संदर्भ क्र.८ दि.२३.०२.२०२३ मधील अटी व शर्तीनुसार सन २०२३-२४ या शैक्षणिक वर्षापासून सदर योजनेचा लाभ अनुज्ञेय करण्यात येत आहे.

२. उक्तप्रमाणे परीक्षा शुल्क व शिक्षण शुल्काची परिगणना करताना न्यायमूर्ती श्री.एम.एन.गिलानी (निवृत्त) समितीच्या शिफारशीनुसार विद्यार्थीसंख्या भारित सरासरी (Weighted Average) ह्या सुत्रानुसार परिगणित केलेल्या शुल्कातुन विद्यापीठीय स्थलांतरण घटक / गुणक (Discounting Factor) नुसार २० टक्क्यांची कपात करुन राज्यातील अभिमत विद्यापीठातील व्यावसायिक अभ्यासक्रमासह प्रवेशित विद्यार्थ्यांना वार्षिक शैक्षणिक शुल्काची प्रतिपूर्ती शिष्यवृत्तीच्या स्वरुपात अनुज्ञेय होईल. सदर योजनेतंर्गत शिष्यवृत्तीसाठी पात्र ठरणाऱ्या विद्यार्थ्यांना अभ्यासक्रमनिहाय व सुत्रनिहाय अंदाजित केलेल्या शुल्कांचे तपशिलवार विवरणपत्र **"परिशिष्ट-अ"** नुसार राहिल.

३. उक्तप्रमाणे शिष्यवृत्तीस पात्र विद्यार्थ्यांना शिष्यवृत्तीचे प्रदान शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, संदर्भ क्र.४ दि.०७.१०.२०१७ अन्वये विहित केलेल्या कार्यपध्दतीनुसार डीबीटी पोर्टलवर करण्याची कार्यवाही संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे यांनी माहिती व तंत्रज्ञान विभागाच्या समन्वयाने पार पाडावी.

४. शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, संदर्भ क्र.४ दि.०७.१०.२०१७ शासकीय, शासन अनुदानित व कायम विनाअनुदानित महाविद्यालये/शासकीय विद्यापीठे व त्या विद्यापीठांतर्गत येणाऱ्या उपकेंद्रामधील मान्यताप्राप्त व्यावसायिक अभ्यासक्रमांसाठी शासनाच्या सक्षम प्राधिकरणामार्फत केंद्रीभूत प्रवेश प्रकियेद्वारे प्रवेश घेणे व शुल्क नियामक प्राधिकरणाद्वारे निश्चित केल्याप्रमाणे शिक्षण शुल्क आकारणे ह्या अटी, अभिमत विद्यापीठातील विद्यार्थ्यांकरीता लागू असणार नाहीत.

५. अभिमत विद्यापीठातील विद्यार्थ्यांना शिक्षण शुल्क प्रतिपूर्ती करण्याच्या अनुषंगाने संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे यांनी अभिमत विद्यापीठे यांच्याशी समन्वय राखून योजनेची कार्यपध्दती निश्चित करावी.

६. राज्यातील अभिमत विद्यापीठातील व्यावसायिक अभ्यासक्रमांसह प्रवेशित पात्र इमाव, विजाभज व विमाप्र प्रवर्गातील विद्यार्थ्यांच्या शिष्यवृत्ती प्रतिपूर्तीच्या अनुषंगाने राज्य शासनाच्या यंत्रणे सोबत समन्वयासाठी संबंधित अभिमत विद्यापीठांनी नोडल अधिकाऱ्यांची

नियुक्ती करावी व तसे शासनास व संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे यांना अवगत करावे.

७. अभिमत विद्यापीठांच्या कार्यपध्दतीबाबत विद्यापीठ अनुदान आयोगाने दि.२०.०२.२०१९ च्या अधिसूचनेन्वये प्रसिध्द केलेल्या UGC (Institutions Deemed to be Universities) Regulations, २०१९ व शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, दिनांक २३.२.२०२३ मध्ये नमुद अटी व शर्थी लागू राहतील.

८. सदर शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभागाच्या संदर्भ क्र.८ दि.२३.०२.२०२३ च्या धर्तीवर आणि त्याविभागाच्या अनौपचारिक संदर्भ दि.२६.०४.२०२४ अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करून देण्यात आलेला असून त्याचा संगणक संकेतांक२०२४०६१८१२०९०१५३३४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

KAILAS TARACHAND SALUNKE

Digitally signed by KAILAS TARACHAND SALUNKE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=OTHER BACKWARD BAHUJAN WELFARE DEPARTMENT,
2.5.4.20=2251a03d4696f35feb94e0a8547536fa68882bdecaaba93cee29502d225f6286, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=35C845457FD4B891124529DBD2192A0E21273AD7339A5CA3B170A0E91352CED7, cn=KAILAS TARACHAND SALUNKE
Date: 2024.06.18 12:25:58 +05'30'

**( कैलास सांळुके )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा. मंत्री / मा. राज्यमंत्री (सर्व), मंत्रालय, मुंबई
४. मा. अध्यक्ष, विधानसभा यांचे खाजगी सचिव, विधानभवन, मुंबई
५. मा. सभापती, विधानपरिषद यांचे खाजगी सचिव, विधानभवन, मुंबई
६. मा. उपाध्यक्ष, विधानसभा यांचे खाजगी सचिव, विधानभवन, मुंबई
७. मा. उपसभापती, विधानपरिषद यांचे खाजगी सचिव, विधानभवन, मुंबई
८. मा. विरोधी पक्षनेता (विधानसभा) यांचे खाजगी सचिव, विधानभवन, मुंबई
९. मा. विरोधी पक्षनेता (विधानपरिषद) यांचे खाजगी सचिव, विधानभवन, मुंबई
१०. मा.संसद सदस्य (महाराष्ट्र राज्यातील)
११. मा.विधानसभा सदस्य (सर्व), विधान भवन, मुंबई
१२. मा.विधानपरिषद सदस्य (सर्व), विधान भवन, मुंबई
१३. मा. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
१४. सर्व प्रशासनिक विभागाचे अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव, मंत्रालय, मुंबई
१५. सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
१६. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१७. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
१८. प्रधान सचिव, इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई

१९. सचिव, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, मंत्रालय, मुंबई
२०. आयुक्त, कृषी, महाराष्ट्र राज्य, पुणे
२१. आयुक्त, दुग्ध व्यवसाय विकास, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२२. आयुक्त, मत्स्य व्यवसाय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२३. संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२४. संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे
२५. संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२६. संचालक, माहिती तंत्रज्ञान, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
२७. संचालक, पशु संवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे
२८. संचालक, कला संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२९. सहसंचालक, तंत्र शिक्षण विभागीय कार्यालये (सर्व)
३०. सहसंचालक, उच्च शिक्षण, विभागीय कार्यालये (सर्व)
३१. कुलसचिव, सर्व अभिमत विदयापिठे, महाराष्ट्र राज्य
३२. महासंचालक,माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
३३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र - १/२, मुंबई / नागपूर
३४. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र - १/२, मुंबई / नागपूर
३५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
३६. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
३७. उप सचिव (शिक्षण-१), इतर मगास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई
३८. निवडनस्ती/शिक्षण-१.

| शासन निर्णय क्र. शिवृत्ती-२०२३/प्र.क्र.८४/शिक्षण-१, दि .१४.०६.२०२४ सोबतचे परिशिष्ट "अ" | | |
|---|---|---|
| न्यायमुर्ती श्री.गिलानी समितीच्या शिफारसीनुसार परिगणित करावयाच्या अभ्यासक्रमनिहाय शुल्काचा तपशिल | | |
| अ .क्र. | अभ्यासक्रमाचे नांव | FRA नुसार शैक्षणिक शुल्क (रू.) |
| | | Weighted Avg (Total institutewise fees X Total Institute Students/ Total No.of Students) |
| १ | २ | ३ |
| DTE Courses | | |
| १ | B.Tech.Computer Science and Engineering | १,०९,३२७ |
| २ | B.Tech. Information Technology | १,०९,३२७ |
| ३ | B.Tech. Electronics and Telecommunication | १,०९,३२७ |
| ४ | B.Tech. Mechanical Engineering | १,०९,३२७ |
| ५ | B.Tech. Civil Engineering | १,०९,३२७ |
| ६ | B.Tech Chemical Engineering | १,०९,३२७ |
| ७ | B.Tech Electrical Engineering | १,०९,३२७ |
| ८ | B.Tech.(Computer Science and Engineering) | १,०९,३२७ |
| ९ | B.Tech (Electronics & Tele-Communication Engineering) | १,०९,३२७ |
| १० | Bachelor of Chemical Engineering | १,०९,३२७ |
| ११ | B.Tech Fibres and Textile Processing Technology | १,०९,३२७ |
| १२ | B.Tech Polymer Engineering and Technology | १,०९,३२७ |
| १३ | B.Tech Food Engineering and Technology | १,०९,३२७ |
| १४ | B.Tech Oil, Oleochemicals and Surfactants Technology | १,०९,३२७ |
| १५ | B.Tech Surface Coating Technology | १,०९,३२७ |
| १६ | MBA | १,२१,९०९ |
| १७ | MCA | ९२,१०१ |
| १८ | Hotel management BHMCT | १,१०,५१८ |
| १९ | MHMCT | ७६,००० |
| २० | DHMCT | ६९,००० |
| २१ | Pharm.D | १,२२,३१० |
| २२ | Polytechnic | ५५,८४१ |
| २३ | Bachelor of Architecture | १,२५,९२७ |
| २४ | Diploma in Pharmacy | ६९,३२३ |
| २५ | B.Pharmacy | ९५,७८९ |
| २६ | M. Pharmacy | १,२८,०८२ |

| | | |
|---|---|---|
| MED Couses | | |
| १ | MBBS | ९,११,७३८ |
| २ | BDS | ३,३९,८५३ |
| ३ | BAMS | १,९०,८४७ |
| ४ | BHMS | ८०,९९६ |
| ५ | BSC NURSING | ७८,७३१ |
| ६ | PBBSC NURSING | ७८,३७२ |
| ७ | BPTH | १,१७,३३७ |
| DHE Couses | | |
| १ | LLB (३ Yrs) | २२,७६४ |
| २ | BA LLB (५ Yrs) | २५,०८२ |
| ३ | BA LLB (५Yrs) Un-aided | २५,०८२ |
| ४ | BA LLB ( Honours) | २५,०८२ |
| ५ | BBA LLB (५ yrs) | २५,०८२ |
| ६ | BBA LLB (Honours) | २५,०८२ |

KAILAS TARACHAND SALUNKE

Digitally signed by KAILAS TARACHAND SALUNKE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=OTHER BACKWARD BAHUJAN WELFARE DEPARTMENT, 2.5.4.20=2251a03d4696f35feb94e0a8547536fa68882bdecaaba93cee29502d225f6286, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=35C845457FD4B891124529DBD2192A0E21273AD7339A5CA3B170A0E91352CED7, cn=KAILAS TARACHAND SALUNKE
Date: 2024.06.18 12:26:23 +05'30'

**(कैलास सांळुके)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**